महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.५९/२०१४/आस्था-३

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख : २० ऑगस्ट, २०१४.

**संदर्भ-**

१) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे-१०१३/प्र.क्र.१२१/२०१३/ आस्था-३, दिनांक ३.३.२०१४.
२) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे-१०१४/प्र.क्र.५९/२०१४/आस्था-३, दिनांक ४ ऑगस्ट, २०१४.
३) मूळ अर्ज क्र.७१२/२०१४- श्री.आर.एम. पाटील विरुध्द महाराष्ट्र शासन आणि इतर मध्ये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिनांक ७.८.२०१४ रोजी दिलेला न्यायनिर्णय.

**शासन आदेश-**

संदर्भाधीन क्र.३ येथे नमूद मूळ अर्ज क्र.७१२/२०१४ (श्री.आर.एम. पाटील विरुध्द महाराष्ट्र शासन आणि इतर) मध्ये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिनांक ७.८.२०१४ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने आणि सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने या विभागातील श्री.टी.ओ. चव्हाण, सध्या नियुक्तीशिवाय (तत्कालीन गट विकास अधिकारी, पंचायत समिती कल्याण, जि.ठाणे) यांना संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद दिनांक ४.८.२०१४ च्या आदेशातील अ.क्र.१ नुसार दिलेल्या पदस्थापनेत बदल करुन; या आदेशान्वये श्री.टी.ओ. चव्हाण यांची उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद, पालघर या नवनिर्मित रिक्त पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

२. तसेच, श्री.आर.एम. पाटील, गट विकास अधिकारी, पंचायत समिती पनवेल, जि.रायगड यांची संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद दिनांक ४.८.२०१४ च्या आदेशातील अ.क्र.२ नुसार गट विकास अधिकारी, पंचायत समिती श्रीगोंदा, जि.अहमदनगर या रिक्त पदावर करण्यात आलेली बदली या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे. परिणाम स्वरुप श्री.आर.एम. पाटील गट विकास अधिकारी, पंचायत समिती पनवेल, जि.रायगड या पदावर कार्यरत राहतील.

३. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

५. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१२३८४६०७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: CN = Bandekar-Deshmukh Sarita Rishi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.08.20 16:08:25 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
२. विभागीय आयुक्त कोकण / नाशिक
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे /पालघर /रायगड / अहमदनगर.
४. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
५. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
७. मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
८. संबंधित अधिकारी (संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद) यांचेमार्फत.
९. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०.निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.